सन २०१३-१४ या आर्थिक वर्षात सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजनेंतर्गत राज्य शासनाचा हिस्सा वितरित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुजयो-२०१४/प्र.क्र.१७९/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १५ डिसेंबर, २०१४.

वाचा -

1. **केंद्र शासनाच्या गृहनिर्माण व दारिद्र्य निर्मुलन मंत्रालयाचे आदेश क्रमांक जी-२४०११/६/२०१३-UPA/ FTS: १०३०७, दिनांक- २५.०३.२०१४.**
2. **केंद्र शासनाच्या गृहनिर्माण व दारिद्र्य निर्मुलन मंत्रालयाचे आदेश क्रमांक जी-२४०११/६/२०१३-UPA/ FTS: १०३०७, दिनांक- २५.०३.२०१४.**
3. **केंद्र शासनाच्या गृहनिर्माण व दारिद्र्य निर्मुलन मंत्रालयाचे आदेश क्रमांक जी-२४०११/६/२०१३-UPA/ FTS: १०३०७, दिनांक- २५.०३.२०१४.**
4. **नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांचे पत्र क्र. सुजयो-२०१४/अनुदान/का-१६, दिनांक ०८.०७.२०१४.**

**प्रस्तावना -**

केंद्र पुरस्कृत सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजनेसाठी केंद्र शासन व राज्य शासन यांचा ७५:२५ असा वित्तीय आकृतीबंध आहे. सदर योजनेसाठी उपरोक्त संदर्भाधीन १, २ व ३ नुसार केंद्र शासनाने सन २०१३-१४ या आर्थिक वर्षासाठी केंद्र शासनाचा हिस्सा म्हणून रूपये ३९.४८४३ कोटी इतका निधी नगरपरिषद प्रशासन संचालनालयाकडे वितरित करण्यात आला आहे.

०२. सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजनेसाठी राज्य शासनाचा २५ टक्के हिस्सा म्हणून सन २०१३-१४ या आर्थिक वर्षात सुधारित अंदाजानुसार आवश्यक अर्थसंकल्पीय तरतूद लेखाशिर्ष क्रमांक २२३०१२३२ मध्ये उपलब्ध आहे. सदर उपलब्ध तरतूदीपैकी केंद्र शासनाने संदर्भाधीन आदेशान्वये वितरित केलेल्या निधीच्या प्रमाणात राज्य शासनाचा हिस्सा म्हणून रूपये १३.१६१४ कोटी एवढा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजनेतंर्गत केंद्र शासनाने संदर्भाधीन क्रमांक १, २ व ३ येथील आदेशान्वये सन २०१३-१४ या अर्थिक वर्षाकरिता वितरित केलेल्या रूपये ३९.४८४३ कोटीच्या प्रमाणात राज्य शासनाचा हिस्सा म्हणून देय ठरणारी रक्कम रूपये १३.१६१४ कोटी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर निधी आहरित करण्यासाठी सहाय्यक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर रक्कमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालय, बांद्रा (पूर्व), मुंबई येथे सादर करून धनादेश प्राप्त करून घ्यावा.

०३. या प्रयोजनासाठी होणारा खर्च हा नगर विकास विभाग- मागणी क्रमांक एफ-३, २२३०, कामगार व सेवायोजन, ०२, सेवायोजन सेवा, १०१ सेवायोजन सेवा, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०२) सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजना- राज्य योजना (०२) (०१) सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजना (२२३०१२३२), ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील सन २०१४-१५ करिता मंजूर उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

०४. सदरचा शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक: अनौ-७०९/व्यय-३, दिनांक २१.११.२०१४ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१५१७०६०९६१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Shankar Shete

Digitally signed by Prakash Shankar Shete
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Shankar Shete
Date: 2014.12.15 17:15:58 +05'30'

**(प्र. शं. शेटे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, वित्त, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर
६. संचालक, लेखा व कोशागारे, मुंबई
७. अधिदान व लेखाधिकारी, फोर्ट, मुंबई
८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
९. मुख्य लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
११. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई तथा नोडल एजन्सी
१२. उप सचिव (नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. उप सचिव (नवि-५), रोख शाखा, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. निवडनस्ती, नवि-३३